**श्री. महेश ढवळे यांची अध्यक्ष, राज्य अन्न आयोग या पदावर पुर्णवेळ नियुक्ती करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: राअअ-२०२५/प्र.क्र.०३/ना.पु. २२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: २८ एप्रिल, २०२५

**संदर्भ:-**

१. शासन अधिसूचना क्रमांक: असुका-२०१७/प्र.क्र ७४/नापु २२, दिनांक ११ एप्रिल, २०१७.
२. शासन निर्णय क्रमांक: असुका-२०१८/प्र.क्र.५९/ना.पु.२२, दिनांक १६.०६.२०२२.
३. शासन आदेश क्रमांक:-राअअ-२०२२/प्र.क्र.५३/नापु २२, दिनांक १६.१२.२०२४.

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्र राज्यामध्ये दिनांक १ फेब्रुवारी, २०१४ पासून राष्ट्रीय अन्नसुरक्षा अधिनियम, २०१३ ची अंमलबजावणी सुरू झालेली आहे. राष्ट्रीय अन्नसुरक्षा अधिनियम, २०१३ मधील कलम १६ ते २१ मध्ये राज्य अन्न आयोगाची रचना व कार्यपध्दती विषद केली आहे. सदर अधिनियमातील कलम १६ (१) अन्वये अधिनियमाच्या अंमलबजावणीवर संनियंत्रण व पुनर्विलोकनाच्या प्रयोजनार्थ “राज्य अन्न आयोग” गठीत करण्याची तरतूद आहे. त्यानुसार राज्यामध्ये दि.११ एप्रिल, २०१७ च्या शासन अधिसूचनेन्वये “राज्य अन्न आयोग” गठित करण्यात आलेला आहे. तसेच, उक्त अधिनियमातील कलम १६(३) मध्ये आयोगाचे अध्यक्ष व सदस्य नियुक्त करण्याची तरतूद नमूद करण्यात आली आहे.

२. संदर्भ क्र.३ येथील शासन आदेश दि.१६.१२.२०२४ अन्वये, श्री.महेश ढवळे यांची सदस्य, राज्य अन्न आयोग या पदावर तात्पुरती नियुक्ती करुन त्यांच्याकडे अध्यक्ष, राज्य अन्न आयोग या पदाचा अतिरिक्त कार्यभार सोपविण्यात आला आहे. महाराष्ट्र अन्न सुरक्षा अधिनियम (सुधारणा), २०२३, नियम ४ (२) व (३) अन्वये राज्य अन्न आयोगावर अध्यक्ष व सदस्य यांची पूर्णवेळ नियुक्ती करण्यासाठी वर्तमानपत्रामध्ये / विभागाच्या संकेतस्थळावर जाहिरात प्रसिद्ध करून उमेदवारांकडून अर्ज मागविण्यात आले होते. त्यानुसार शासनस्तरावर प्राप्त अर्जांची सचिव (अ.ना.पु. व ग्रा.सं.वि.) यांच्या अध्यक्षतेखाली गठित करण्यात आलेल्या छाननी समितीद्वारे छाननी करण्यात आली व समितीने छाननी केलेल्या पात्र उमेदवारांची सूची अध्यक्ष व सदस्यांच्या नियुक्तीसाठी राज्यशासनाकडे विचारार्थ सादर केली होती. त्यानुषंगाने राज्य अन्न आयोगावर पूर्णवेळ अध्यक्षांची नेमणूक करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

राष्ट्रीय अन्नसुरक्षा अधिनियम, २०१३ मधील कलम १६ (३) नुसार श्री. महेश ढवळे यांची राज्य अन्न आयोगाचे पूर्णवेळ अध्यक्ष म्हणून नियुक्ती करण्यात येत आहे. तसेच, संदर्भ क्रमांक ३ येथील दि.१६.१२.२०२४ रोजीचा आदेश रद्द करण्यात येत आहे.

२. राष्ट्रीय अन्न सुरक्षा अधिनियम, २०१३ मधील कलम १६(४) नुसार राज्य अन्न आयोगाचे अध्यक्ष त्यांनी पदग्रहण केल्याच्या दिनांकापासून ५ वर्षापेक्षा अधिक नसेल इतक्या मुदतीसाठी पद धारण करतील आणि ते पुनर्नियुक्तीसाठी पात्र असतील. तथापि, त्यांच्या वयाची ६५ वर्ष पुर्ण झाल्यानंतर ते अध्यक्ष, राज्य अन्न आयोग म्हणून पद धारण करणार नाहीत.

३. राष्ट्रीय अन्न सुरक्षा अधिनियम, २०१३ च्या कलम १६(६) मधे नमूद केलेली कार्ये अध्यक्ष, राज्य अन्न आयोग पार पाडतील. तसेच, राज्य अन्न आयोगाच्या अध्यक्ष पदाच्या कर्तव्य व जबाबदाऱ्या महाराष्ट्र अन्न सुरक्षा नियम, २०१९ मधील नियम ७ मध्ये नमूद करण्यात आल्या आहेत.

४. संदर्भांकीत शासन निर्णय दि.१६.०६.२०२२ मधील तरतुदीनुसार राज्य अन्न आयोगाच्या अध्यक्षांना सोयीसुविधा अनुज्ञेय राहतील.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०४२८१६०५०२०८०६ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by SANTOSH UMESHRAO GAIKWAD
Date: 2025.04.28 16:06:06 +05'30'

**( संतोष गायकवाड )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव.
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
३. मा. उपमुख्यमंत्री (नगर विकास व गृहनिर्माण) यांचे प्रधान सचिव.
४. मा. उपमुख्यमंत्री (वित्त व नियोजन) यांचे प्रधान सचिव.
५. मा. मंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव.
६. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
७. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
८. सर्व मा. विधान परिषद सदस्य व मा. विधानसभा सदस्य.
९. सर्व मंत्रालयीन विभाग.
१०. सर्व विभागीय आयुक्त.

११. सर्व जिल्हाधिकारी.

१२. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा.

१३. नियंत्रक, शिधावाटप व संचालक, नागरी पुरवठा, मुंबई.

१४. सर्व सहसचिव/उपसचिव/अवर सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

१५. वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.

१६. सर्व उपायुक्त (पुरवठा).

१७. सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी.

१८. सर्व अन्नधान्य वितरण अधिकारी.

१९. सर्व कार्यासन अधिकारी, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग.

२०. सर्व खाजगी सचिव, मा. मंत्री कार्यालये, मंत्रालय, मुंबई.

२१. सर्व खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री कार्यालये, मंत्रालय, मुंबई.

२२. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.

२३. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ग्रंथालय, ६वा मजला, विधानभवन, मुंबई.

२४. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.

२५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.

२६. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-२, मुंबई.

२७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, मुंबई.

२८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.

२९. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, नागरी पुरवठा, लेखा परिक्षा मंडळ द्वारा - वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.

३०. सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांचे स्वीय सहायक.

३१. निवडनस्ती (कार्यासन नापु-२२).